वर्धा  जिल्ह्यातील वर्धा तालुक्यातील योजनाबाह्य रस्ता ग्रामीण मार्ग  म्हणून रस्ते विकास योजना २००१-२१ मध्ये समाविष्ट करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
सार्वजनिक बांधकाम विभाग
शासन निर्णय क्रमांकः रवियो-२०२३/प्र.क्र.११७/नियोजन-२
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक -२६ जून, २०२३

पहावे :-  १) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर यांचे  पत्र जा.क्र.प्रआ/२१५३, दि.१२/०४/२०२३.

प्रस्तावना :-

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर यांनी संदर्भाधिन पत्रान्वये  वर्धा  जिल्ह्यातील वर्धा तालुक्यातील योजनाबाह्य रस्ता ग्रामीण मार्ग  म्हणून रस्ते विकास योजना सन २००१-२१ मध्ये समाविष्ट करणेबाबत प्रस्ताव शासनास सादर केलेला आहे. तसेच जिल्हा परिषद, वर्धा  यांनी  सदर रस्ते  ग्रामीण मार्ग म्हणून रस्ते विकास योजनेमध्ये समाविष्ट करणेबाबत मागणी केलेली आहे.

सदर रस्त्याचा होणारा वापर तसेच  जिल्हा परिषद, वर्धा  यांचा ठराव विचारात घेता, सदर रस्ते ग्रामीण मार्ग म्हणून रस्ते विकास योजना सन २००१-२१ मध्ये समाविष्ट करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

शासन निर्णय :-

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर यांचा प्रस्ताव व  जिल्हा परिषद, वर्धा  यांचा ठराव विचारात घेऊन वर्धा  जिल्ह्यातील वर्धा तालुक्यातील खालील रस्ता ग्रामीण मार्ग म्हणून रस्ते विकास योजना सन २००१-२१ मध्ये समाविष्ट करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | प्रस्तावित रस्त्याचे नांव | साखळी क्रमांक | दर्जोन्नत करावयाची एकूण लांबी (कि.मी.) | दर्जोन्नती नंतरचा क्रमांक |
|---|---|---|---|---|
| तालुका- वर्धा | | | | |
| १. | रामा ३२६ करंजी (काजी) ते दोंदोडा रस्ता. | ०/०० ते ३/५०० | ३.५०० कि.मी. | ग्रामीण मार्ग- १०१ |
| | **एकूण** | | **३.५०० कि.मी.** | |

परिणामी रस्ते विकास योजना २००१-२०२१ मधील वर्धा जिल्ह्यातील ग्रामीण मार्ग रस्त्यांच्या एकूण लांबीत **३.५०० कि.मी.** ने वाढ होवून एकूण लांबी (२३१८.९०० + ३.५००) म्हणजेच **२३२२.४०० कि. मी.** इतकी होईल.

हा शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२३०६२७१२५४०७४९१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

GANPAT SANDIPAN KACHARE

Digitally signed by GANPAT SANDIPAN KACHARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3021bf955fefd71ffad5dd7c97769147f19aca6383a12fed6cff4849d78e224a, pseudonym=44879507A55BADCE1C62B2D52FC25354CE085DFF, serialNumber=B5B30AEBA818C77E43E7B8BA4BCA0E9F0D137FEAB0BBCB16CACF2D44087E8A76, cn=GANPAT SANDIPAN KACHARE
Date: 2023.06.27 12:55:07 +05'30'

**( ग. सं. कचरे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, नागपूर.
२) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर. (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)
३) अधिक्षक अभियंता,सार्वजनिक बांधकाम मंडळ, चंद्रपूर. (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करण्यात यावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)

**प्रत :-**

१) उप सचिव, ग्राम विकास विभाग, बांधकाम भवन, मर्झबान पथ, फोर्ट, मुंबई.
२) जिल्हाधिकारी, वर्धा.
३) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद वर्धा.
४) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, वर्धा.
५) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.
६) रेखाचित्र शाखा, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय.
७) रस्ते विकास योजना २००१-२०२१ ची नस्ती.
८) निवडनस्ती.